मंत्रालय नविन प्रशासन भवन, जी.टी.रुग्णालय व बांधकाम भवन या इमारतींमधील मंत्रालयीन विभागातील "ड" वर्ग रद्दी उचलण्यासाठी २०१५-२०१६ वर्षासाठी ठेकेदार नियुक्त करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक बांधकाम विभाग**

**शासन परिपत्रक क्रमांक-रकावि-२०१२/प्र. क्र.५०/प्रशा-४,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दिनांक:- १६/०६/२०१५.

वाचा- उद्योग, उर्जा व कामागार विभाग, शासन निर्णय, क्र. पीबीडब्ल्यू १३८४/४३८२६/८७००/ उद्योग-६, दिनांक १७/३/१९८६.

**प रि प त्र क**

उद्योग, उर्जा व कामगार विभागाच्या संदर्भाधीन शासन निर्णयाद्वारे मंत्रालय व नविन प्रशासन भवन इमारतीमधील "ड" वर्ग रद्दीची विल्हेवाट लावण्याचे अधिकार सार्वजनिक बांधकाम विभागास दिले आहेत. त्यानुसार या विभागाने दि.०१/४/२०१५ ते दि.३१/३/२०१६ या कालावधीसाठी मंत्रालय, नवीन प्रशासन भवन, जी. टी. रुग्णालय व बांधकाम भवन या इमारतींमधील मंत्रालयीन विभागातील "ड" (अन्य संकिर्ण रद्दी, झाडलोटीने गोळा होणारा कचरा) वर्ग रद्दी विकत घेण्यासाठी खाली नमूद केलेल्या कंत्राटदाराची नेमणूक केली आहे. त्यांचे "ड" वर्ग रद्दी विकत घेण्याचे दर खालीलप्रमाणे असून ते स्वीकारण्यात आले आहेत.

| कंत्राटदाराचे नाव व पत्ता | रद्दीचा प्रकार | प्रती क्विंटल दर | ठेकेदाराचा मोबाईल क्रमांक |
|---|---|---|---|
| **मे. साक्षी एंटरप्रायझेस, गाळा नं. २, अनिश कंपाऊंड, मेहमूद कॉटेज, वैशाली निवास, ए.जी. लिंक रोड, साकीनाका, मुंबई ४०० ०७२.** | **"ड" वर्ग ( अन्य संकिर्ण रद्दी, झाडलोटीने गोळा होणारा कचरा )** | **रु.९१०/-** | **९८२२५१११७७ ९८६९०४७३४१** |

शासनाने उपरोक्त ठेकेदाराबरोबर एक वर्षाचा (दिनांक ०१/०४/२०१५ ते दिनांक ३१/०३/२०१६ अथवा पुढील वर्षाची निविदा प्रक्रिया पूर्ण होईपर्यंत) करारनामा केलेला आहे. त्या करारनाम्याची एक प्रत त्यांच्याकडे देण्यात आलेली असून, आपण आवश्यक तेव्हा अवलोकनार्थ मागून घ्यावी.

उपरोक्त कंत्राटदाराने करारनाम्यातील अटी व शर्तीनुसार मंत्रालय, नविन प्रशासन भवन, जी. टी. रुग्णालय व बांधकाम भवन या  इमारतींमधील मंत्रालयीन विभागातील "ड" वर्ग रद्दी उचलण्याची व्यवस्था करावी.

सदर शासन प रि प त्र क  महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०७०९१७२५१८३५१८ असा आहे. हे प रि प त्र क डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Gorakh P Jagtap

Digitally signed by Gorakh P Jagtap
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Gorakh P Jagtap
Date: 2015.07.10 15:59:47 +05'30'

**( गो. पां. जगताप )**

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१. अवर सचिव, (र. व का./आस्थापना/प्रशासन/नोंदणी शाखा), सर्व मंत्रालयीन विभाग, मुंबई-३२.

२. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग, (का-२१), मंत्रालय, मुंबई.

३. संचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई.

४. मंत्रालयातील सर्व विभागाचे नोंदणी शाखा प्रमुख, मंत्रालय, मुंबई.

५. नविन प्रशासकीय भवन, जी. टी. रुग्णालय व बांधकाम भवन या इमारतींमधील सर्व कार्यालये, मुंबई.

६. मे. साक्षी एंटरप्रायझेस, गाळा नं. २, अनिश कंपाऊंड, मेहमूद कॉटेज, वैशाली निवास, ए.जी. लिंक रोड, साकीनाका, मुंबई ४०० ०७२.

७. निवड नस्ती, सार्वजनिक बांधकाम विभाग, (प्रशा-४), मंत्रालय, मुंबई.